`कोषागारातून रोख देय अनुदान
**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत...**
**सहाय्यीकृत बाबी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण व** National Clean Energy Fund
**लेखाशिर्ष २२१५** ९७९१

महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१५/प्र.क्र.३३/पा.पु.१०**

जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २३ जून, २०१५

## शासन निर्णय -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support ), पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) व National Clean Energy Fund या घटकांसाठी प्राप्त झालेली एकूण रु. ३१.०३४६ कोटी एवढी रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support) या घटकासाठी प्राप्त झालेली रु. १८.८८५६ कोटी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) घटकासाठी प्राप्त झालेली रु. ११३३.१५ कोटीव National Clean Energy Fund या घटकासाठी रु. ०.८१७५ कोटी अशी एकूण रु. ३१.०३४६ कोटी (रुपये एकतीस कोटी, तीन लक्ष व सेहेचाळीस हजार मात्र) एवढी रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम या प्रयोजनार्थ केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार / आदेशानुसार खर्च करण्यात यावी.

केंद्र शासनाकडून वरील घटकांसाठी प्राप्त झालेली एकूण रु. ३१.०३४६ कोटी एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रु. ३१.०३४६ कोटी ( रुपये एकतीस कोटी, तीन लक्ष व सेहेचाळीस हजार मात्र ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट(जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), श्री. का. जा. धलपे, अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना

व नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव व संचालक, (श्री. शां. सि. कुदळे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर रक्कम रु. ३१.०३४६ कोटी कोषागार कार्यालयातून आहरीत करुन सदर रक्कम स्वतंत्र धनादेशान्वये पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष - २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२, जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदान, (०२) (०२५), राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) ( २२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि. १७/०४/२०१५ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०३३११२१७१७०३२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shirish Vasant Godbole

Digitally signed by Shirish Vasant Godbole
DN: CN = Shirish Vasant Godbole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section officer
Date: 2015.06.23 15:34:12 +05'30'

**( शि. व. गोडबोले)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र २- नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
कार्यासन-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

वित्त विभाग, कार्यासन व्यय-३ ,मंत्रालय ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट(जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ,मंत्रालय , सी.बी.डी.बेलापूर ,नवी मुंबई (तीन प्रती)
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु-१० कार्यासन